राष्ट्रीय कृषी विकास योजना सन २०१६-१७ अंतर्गत मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा पुरविण्याच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मत्स्यवि-१११७/प्र.क्र.६१/पदूम-१४**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २३ फेब्रुवारी, २०१७

वाचा: १) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, पत्र क्रमांक आरकेव्हीवाय-१०१६/प्र.क्र.१२२/आरकेव्हीवाय-सेल, दिनांक: ७ नोव्हेंबर, २०१६
२) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, पत्र क्रमांक आरकेव्हीवाय-०९१६/प्र.क्र.१३६/आरकेव्हीवाय-सेल, दिनांक: ७ फेब्रुवारी, २०१७
३) आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्रमांक मत्स्य/अभि/१८०४०८/२०१/ २०१६, दिनांक ३ फेब्रुवारी,२०१७

**प्रस्तावना:**

महाराष्ट्रातील सागरी जिल्हयांमध्ये असणा-या मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांसाठी ब-याच ठिकाणी कमी प्रमाणात मुलभूत सोयी-सुविधा उपलब्ध आहेत. राष्ट्रीय कृषी विकास योजने अंतर्गत राज्यातील सागरी जिल्हयामध्ये मासळी उतरविण्याच्या ठिकाणी मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा उपलब्ध करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यासंदर्भात प्रधान सचिव (कृषि) यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २६.१०.२०१६ रोजी झालेल्या राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीच्या (SLPSC) दुस-या बैठकीत रु.१०७ कोटी इतक्या रकमेचे ६ प्रकल्प विचारात घेण्यात आले. दिनांक २३.१.२०१७ रोजी मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षातेखाली झालेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या (SLSC) २२ व्या बैठकीत राष्ट्रीय कृषी विकास योजना सन २०१६-१७ अंतर्गत मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा पुरविण्याच्या रक्कम रु.१०७ कोटी रकमेच्या ६ कामांना मंजुरी देण्यात आली आहे. त्यामुळे सदर कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय कृषी विकास योजने अंतर्गत सन २०१६-१७ या वर्षासाठी राज्यातील सागरी जिल्यामध्ये मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या ६ कामांसाठी रु.१०७ कोटी (रुपये एकशे सात कोटी फक्त.) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर कामांची प्रचलित नियमानुसार निविदा प्रक्रियेबाबतची पुढील कार्यवाही करावी व आवश्यक त्या स्तरावरील ना-हरकत परवानगी प्राप्त करुन घेण्यात याव्यात. तसेच झालेल्या खर्चाचा व कामांचा दर तिमाही आढावा घेवून शासनास अहवाल सादर करावा.

३. सदर शासन निर्णय कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई पत्र क्रमांक आरकेव्हीवाय-०९१६/प्र.क्र.१३६/आरकेव्हीवाय-सेल, दि.७.२.२०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२३१७२५२७५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chitrakala Suryawanshi

Digitally signed by Chitrakala Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b61aaca1243458a7300585877d01b18c73211c3f79c97f57bd06e1e79a2a57ae, cn=Chitrakala Suryawanshi
Date: 2017.02.27 15:47:06 +05'30'

**( चि.नि.सुर्यवंशी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.मुख्यमंत्रयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
५. संचालक / मुख्य अभियंता, CICEF , बेंगलूरु.
६. मुख्य महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, महाराष्ट्र क्षेत्रीय कार्यालय,पुणे
७. सहआयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय,मुंबई
८. कार्यकारी अभियंता, आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय,मुंबई
९. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
१०.सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई/ठाणे/पालघर/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग,
११.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य १ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
१२.वित्त विभाग, (व्यय-१/अर्थसंकल्प-१५/अर्थोपाय/अर्थबळ) मंत्रालय,मुंबई-३२
१३.अवर सचिव, पदूम-१६, कृषि व पदूम विभाग, मंत्रालय,मुंबई
१४.निवडनस्ती.

**शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांकः मत्स्यवि-१११७/प्र.क्र.६१/पदुम -१४**
**दिनांक २३ फेबुवारी २०१७**
**सोबतचे प्रपत्र-अ**

| अक्र | कामाचे नाव | कामाचे स्वरुप | प्रकल्प किंमत रुपये लाखात |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मढ तळपशा ता. अंधेरी जि. मुंबई उपनगर येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | सॉलीड जेट्टी २५ X ५ मी.<br>जेट्टीची जोडरस्त्याचे रुंदीकरण ३ ते २६ मी.<br>बोटयार्ड ३०० X २० मी.<br>मासळी सुकविण्याचा ओटा १२० X ५० मी.<br>सरक्षक भिंत २०० मी. | २४५०.०० |
| २ | उत्तन भातोडी बंदर ता. व जि. ठाणे येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | ब्रेक वॉटर ३५० मी.<br>बोटयार्ड ३०० X ४५ मी.<br>वधंनविहीर व पाईप लाईन्स, पाण्याची टाकी, पाणी वितरण व्यवस्था १ युनिट<br>सौरउर्जा दीप ३० नग | २४००.०० |
| ३ | उत्तन पातान बंदर ता. व जि. ठाणे येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | ब्रेक वॉटर २०० मी.<br>बोटयार्ड २८० X ४५ मी.<br>वधंन विहीर व पाईप लाईन्स, पाण्याची टाकी, पाणी वितरण व्यवस्था १ युनिट<br>सौरउर्जा दीप ३० नग | २०००.०० |
| ४ | बुरोंडी ता. दापोली जि. रत्नागिरी येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | सॉलीड जेट्टी<br>( पोचरस्ता २७० X ५.० मी. व जेट्टी ५० X ५ मी.) बोटयार्ड ३५० X ६० मी.<br>उतरता रॅम्प २ नग २० X ८ मी.<br>वधंनविहीर व पाईप लाईन्स, पाण्याची टाकी, पाणी वितरण व्यवस्था १ युनिट<br>सौरउर्जा दीप ४० नग | २३५०.०० |
| ५ | वरेडी ता. पेण जि. रायगड येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | वार्फ (३५ X १० मी. व १५ X १५ मी.)<br>बोटयार्ड २ नग (९० X ४० मी. व ३५ X १० मी)<br>जोडरस्ता (४५० X ५ मी. व २५० X ५ मी)<br>उतरता रॅम्प २ नग २० X १० मी.-<br>सौरउर्जा दीप ६० नग | १०००.०० |
| ६ | मुर्बे ता. व जि. पालघर येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | बोटयार्ड ३ नग (६० X ३० मी., ४० X ४० मी व ७० X १५ मी) जोडरस्ता (५०० X ५ मी.)<br>सौरउर्जा दीप २० नग | ५००.०० |
| | | **एकूण** | **१०७००.००** |